कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित दर्जा दिल्यानंतर सहाय्यक अभियंता श्रेणी- २ आणि शाखा अभियंता म्हणून करावयाच्या वेतन निश्चितीबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

### शासन परिपत्रक क्रमांकः एसयुटी-१२११/प्र.क्र. २४७/आस्थापना (शा.अ.)

गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल,
नवीन मंत्रालय, मुंबई-४००००१
दिनांक : ६ डिसेंबर २०१४

**वाचा -**

१) शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्रमांकः सीडीएस-१५८२/१५८/(२१५)/ आ१०., दि .१६/४/१९८४
२) शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्रमांकः सीडीएस-१५८२/१५८/(२१५)/ आ.१०, दि. १९/७/१९८४
३) शासन परिपत्रक क्रमांकः जेष्ठता-११८८/(१३४/८८)/आ. स.अ.श्रे. २, दि. १२/४/१९८९

**परिपत्रक-**

१. शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्र. सीडीएस-१५८२/१५८/(२१५)/ आ.१०, दि. १६/४/१९८४ अन्वये पाटबंधारे व सार्वजनिक बांधकाम विभाग या दोन्ही विभागांतर्गत स्थापत्य, यांत्रिकी, विद्यूत व यांत्रिकी तसेच कृषी अभियांत्रिकी क्षेत्रातील कार्यरत असलेल्या पदवीधर कनिष्ठ अभियंत्यांना व विहीत सेवाकाल पूर्ण करणाऱ्या पदविकाधारक, अर्हतारहित कनिष्ठ अभियंत्यांना दिनांक १/४/१९८१ या पूर्वलक्षी प्रभावाने राजपत्रित दर्जा वर्ग -२ (कनिष्ठस्तर) म्हणजेच अनुक्रमे सहाय्यक अभियंता श्रेणी-२ आणि शाखा अभियंता असे संबोधण्याबाबत आणि त्यांना समान वेतनश्रेणी रू. ६००-३०-७५०-४०-९५० मंजूर केल्याबाबत आदेश निर्गमीत केलेले आहेत.

२. उपरोक्त आदेशानुसार कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित दर्जा दिल्यानंतर सहाय्यक अभियंता श्रेणी-२ आणि शाखा अभियंता म्हणून त्यांची वेतन निश्चिती कशा प्रकारे करावी या बाबत शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्र. सीडीएस-१५८२/१५८/(२१५)/ आ.१० दि. १९/७/१९८४ अन्वये आदेश काढण्यात आले. तदनंतर या अधिकाऱ्यांच्या वेतननिश्चितीमधील अडचणी दूर करण्यासाठी शासन परिपत्रक क्र. जेष्ठता-११८८/(१३४/८८)/आ. स.अ.श्रे. २ दि. १२/४/१९८९ निर्गमीत करण्यात आलेले आहे.

३. कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित वर्ग-२ चा दर्जा दिल्यानंतर करावयाच्या वेतननिश्चिती संदर्भात उपरोक्त शासन परिपत्रक दि.१२/४/१९८९ अन्वये दिलेल्या सुचनांनुसार वर्ग-२ चा दर्जा दिल्यानंतर या अभियंत्यांची वेतननिश्चिती करताना त्यांच्या वेतनवाढीचा दिनांक बदलण्यात आल्यामुळे अभियंत्यांना झालेल्या अतिप्रदानाच्या वसुलीच्या विरोधात श्री.अ.मा.देशपांडे व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या मुळ अर्ज क्र.४२१/१९९३ मध्ये मा.न्यायाधिकरणाने दि.१७/८/१९९५ रोजी दिलेल्या निकालानुसार कनिष्ठ अभियंत्यांना शाखा अभियंता पदी देण्यात आलेली दर्जोन्नती ही त्यांच्या कर्तव्य व जबाबदा-या यामध्ये वाढ न होता देण्यात आली असल्यामुळे त्यांना समयश्रेणीतील ( नवीन वेतनश्रेणी ) वेतन लागू झाले असल्याने म.ना.से. (वेतन) नियम १९८१ मधील नियम ३९ (२) (अ) नुसार वेतनवाढीचा दिनांक बदलता येणार नाही असा निर्णय दिला आहे. तसेच, अन्य अभियंता श्री. सुभाषचंद्र आर.राजे यांच्या वेतननिश्चीतीमुळे झालेल्या अतिप्रदानाची त्यांच्या सेवानिवृत्ती वेतनातून सुरू करण्यात आलेल्या वसूली विरुद्ध श्री. सुभाषचंद्र आर.राजे यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे ५४१/२००९ दावा दाखल केला होता. सदर दाव्यामध्ये दि. १७/६/२०१० रोजी श्री. सुभाषचंद्र आर.राजे यांच्या बाजूने न्यायनिर्णय झाला असून, श्री. राजे यांना झालेल्या अतिप्रदानाची वसूली न करण्याचे आदेश देण्यात आले आहेत.

४. वरील श्री.अ.मा.देशपांडे व श्री. सुभाषचंद्र आर.राजे यांच्या प्रकरणी झालेल्या न्यायनिर्णयाप्रमाणे वेतनवाढीचा लाभ मिळणेबाबत श्री सु.द.बनगीनवार व इतर अभियंता यांनी त्यांच्या वेतन निश्चितीबाबत दाखल केला होता. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांच्याकडील सदर मुळ अर्ज क्र.५७८/२०११ बाबत दि.२६.८.२०११ रोजी अंतीम निर्णय दिला असून याचिकाकर्त्यांनी वेतन निश्चितीबाबत शासनाच्या सक्षम प्राधिकरणाकडे अर्ज करण्याचे आदेश दिले असून व अशा अर्जावर प्राधिकरणाने योग्य तो निर्णय घ्यावा असे निर्देश देऊन याचिका निकाली काढली आहे.

५. सदरहू मूळ अर्ज क्र. ५७८/२०११ श्री. सु.द. बनगीनवार, स.अ.श्रे-२ व इतर विरुध्द महाराष्ट्र शासन मधील न्यायानिर्णयाच्या अनुषंगाने वेतन निश्चिती करण्याबाबत मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मुळ अर्ज क्र. ७९९/२०१४ व त्यासोबत संकिर्ण अर्ज क्र. ४५०/२०१४ अन्वये श्री. हणमंत आनंदराव यादव व

इतर यांनी दाखल केले आहेत. तसेच, अशाच सारख्या प्रकारचे मुळ अर्ज मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ औरंगाबाद न्यायाधिकरणांपुढे प्रलंबित आहेत.

६. उपरोक्त सर्व बाबींचा विचार करून पाटबंधारे विभाग, शासन परिपत्रक दि. १२/४/१९८९ याद्वारे रद्द करण्यात येत आहे. त्यामुळे श्री.अ.मा.देशपांडे व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या मुळ अर्ज क्र.४२१/१९९३ मध्ये मा.न्यायाधिकरणाने दि.१७/८/१९९५ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार कनिष्ठ अभियंत्यांना राजपत्रित वर्ग-२ चा दर्जा दिल्यानंतर सहाय्यक अभियंता श्रेणी-२ आणि शाखा अभियंता पदी नियुक्ती ही त्यांच्या कर्तव्य व जबाबदा-या यामध्ये वाढ न होता देण्यात आली असल्यामुळे त्यांना समयश्रेणीतील ( नवीन वेतनश्रेणी ) वेतन लागू झाले असल्याने म.ना.से. (वेतन) नियम १९८१ मधील नियम ३९ (२) (अ) नुसार दर्जोन्नतीपूर्वीचा वेतनवाढीचा दिनांक कायम राहील.

७. सदरहू परिपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४२५/१४/सेवा-३, दिनांक २५/११/२०१४ तसेच अनौ.संदर्भ क्र. ५२९/२०१४/सेवा-३, दिनांक २९/११/२०१४ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे .

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१५१४५०३७७०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhaker S Yadav

Digitally signed by Sudhakar S Yadav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sudhakar S Yadav
Date: 2015.07.22 12:38:46 +05'30'

**(सु.श.यादव)**
**शासनाचे कार्यासन अधिकारी**

**प्रति ,**

सर्व कार्यकारी संचालक/महासंचालक/मुख्य अभियंता/ अधिक्षक अभियंता, जलसंपदा

**प्रत ,**

१) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मंबई-३२

२) प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) सचिव (ले.व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६) महालेखापाल-१/२, (लेखा परिक्षा ) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
७) सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सहसचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०) उपसचिव (सेवा-३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) उपसचिव (आस्था), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) उपसचिव (विधी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५)मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/औरंगाबाद/नागपूर
१६) कक्ष अधिकारी, आस्थापना स.अ.श्रे.२/आस्थापना वर्ग-२/आस्थापना (संनि)/ आस्थापना (तांत्रिक)
१७) का. आस्थापना (शा.अ.) संग्रहार्थ.